**प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**
औरंगाबाद (ग्रामीण) जिल्हयातील उप विभागीय पोलीस अधिकारी, औरंगाबाद ग्रामीण यांचे कार्यालयाकरिता पोलीस दलाचे आधुनिकीकरण कार्यक्रमांतर्गत उपलब्ध निधीतून नियंत्रण कक्षासहित प्रशासकीय इमारत बांधणे.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र. सीआरपी-०२०३/४७६/प्र.क्र.१६६/पोल-७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: २७ ऑगस्ट,२००३.

__वाचा:-__१) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्रमांक:पोमसं/२७/२८-बी-२/आधुनिकीकरण/औरंगाबाद/२००३,दिनांक १७ फेब्रुवारी,२००३ व क्र.पोमसं/२७/२८-बी-२/औरंगाबाद/२००२, दिनांक २८ जुलै,२००३.
२) शासन निर्णय, गृह विभाग,क्रमांक:पीएलएफ-०७०२/प्र.क्र.६८/पोल-४, दिनांक १४ जानेवारी,२००३.
३) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्रमांक:पोमसं/२७/२८-बी-२/आधुनिकीकरण/२००३, दिनांक ३ मार्च,२००३.

__शासन निर्णय:-__ औरंगाबाद (ग्रामीण) जिल्हयातील उप विभागीय पोलीस अधिकारी, ओरंगाबाद ग्रामीण यांचे कार्यालयाकरिता नियंत्रण कक्षासहित प्रशासकीय इमारत बांधण्याच्या कामासाठी येणाऱ्या रु.१५,००,०००/- (रुपये पंधरा लाख फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व त्याबाबतच्या शासनमान्य प्रमाणभूत नमुन्यावर आधारित बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर कामासाठी येणारा खर्च पोलीस दलाचे आधुनिकीकरण कार्यक्रमांतर्गत सन २००२-२००३ या आर्थिक वर्षासाठी पहिल्या टप्प्यात उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये त्यासोबतचे परिशिष्ट (VI) मधील "बिल्डींग" या शिर्षाखालील अनुक्रमांक-III नुसार राज्यातील उप विभागीय कार्यकारी कार्यालये व नियंत्रण कक्ष (पहिला टप्पा) यांचे इमारत बांधकामासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या एकूण रु.३,५१,००,०००/- इतक्या निधीतून भागविण्यात यावा तसेच सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ अट (क) व परिच्छेद क्र.८ मध्ये नमूद बाबींची पूर्तता करण्यात यावी, या अटीच्या अधीन राहून ही प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त कामासाठी होणारा खर्च सन २००२-२००३ या वित्तीय वर्षी मागणी क्र.बी.१, लेखाशिर्ष "२०५५- पोलीस, ११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण, (००) (०२) जिल्हा

पोलीस, (२०५५ ०३४६), ३२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" खाली अर्थसंकल्पित केलेल्या व महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मर्यादित,वरळी, मुंबई यांचेकडे सुपुर्द करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग-पहिला, उप-विभाग-५ अनुक्रमांक-१ अन्वये "महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका" अंतर्गत परिच्छेद क्र. १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ब. बा. चव्हाण )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ,मर्यादित,वरळी,मुंबई.
पोलीस अधिक्षक, औरंगाबाद (ग्रामीण).
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,औरंगाबाद (यांना नकाशे व अंदाजपत्रकासह ५ प्रती) .
महालेखापाल-१/२(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी/ निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२/अर्थ-२);मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
गृह विभाग (पोल-४), मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (पोल-७).